**मुख्यमंत्री धर्मादाय देणगी निधीमधून अर्थसहाय्य मंजूर करणेबाबत.**
**शिवराय बहुउद्देशीय शिक्षण संस्था, जि.अमरावती**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-सीसीएफ-२०२०/प्र.क्र. ८५/२०२०/२५**
मुख्य इमारत, ३ रा मजला,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०३ मार्च, २०२२

**वाचा -**

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. पीडीसी-१०६९-१३५१४-बी, दि. २७/०८/१९६९
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. पीडीसी-१०६९/१३५१४-बी, दि. ०८/१०/१९७०
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.सीसीएफ-२०१४/प्र.क्र.८८/२०१४/२५ दि.१७/९/२०१९

**शासन निर्णय -**

मुख्यमंत्री धर्मादाय देणगी निधीचे संपूर्ण नियंत्रण, व्यवस्थापन व प्रशासन मा. मुख्यमंत्री महोदय यांच्याकडे निहीत आहे. मुख्यमंत्री धर्मादाय देणगी निधीमधून महाराष्ट्र राज्यातील सामाजिक, शैक्षणिक, सांस्कृतिक, धर्मादाय किंवा तत्सम सार्वजनिक किंवा निम सार्वजनिक संस्था किंवा संघटना यांना, या निधीतून मा.मुख्यमंत्री यांच्या स्वेच्छानिर्णयानुसार अर्थसहाय्य देण्यात येते. त्यानुसार मा. मुख्यमंत्री यांच्या मान्यतेने शिवराय बहुउद्देशीय शिक्षण संस्था, जि.अमरावती या संस्थेस अभ्यासिका केंद्र चालविण्याकरिता रुपये ५,६०,२७५/- (अक्षरी रुपये पाच लक्ष, साठ हजार दोनशे पंच्याहत्तर फक्त) इतके अर्थसहाय्य याद्वारे मंजूर करण्यात येत आहे.

२. शिवराय बहुउद्देशीय शिक्षण संस्था, जि.अमरावती द्वारे संस्थेस अभ्यासिका केंद्र चालविण्याचा खर्च भागविण्यासाठी निधी मंजूर करण्यात आला आहे. संस्थेस ज्या प्रयोजनासाठी निधी मंजूर करण्यात आला आहे त्याच प्रयोजनासाठी सदर निधी संस्थेने एका वर्षात खर्च करावा आणि खर्चाच्या अनुषंगाने "सनदी लेखापाल" (Chartered Accountant) यांनी प्रमाणित केलेले उपयोगिता प्रमाणपत्र, निधी प्राप्त झाल्यानंतर एक वर्षात सादर करावे. तसेच सदर संस्थेने नियमानुसार लेखापरिक्षण करुन घेऊन लेखापरिक्षण अहवाल देखील शासनास सादर करावा.

३. सदर निधी वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-१०१०/प्र.क्र.६८/कोषा प्र-५, दि.१८ एप्रिल, २०११ मधील तरतुदीस अनुसरुन मुख्यमंत्री धर्मादाय देणगी निधीच्या स्वीयप्रपंजी (PLA) लेखा खात्यामधून शिवराय बहुउद्देशीय शिक्षण संस्था, जि.अमरावती या संस्थेच्या स्टेट बँक ऑफ इंडिया, शाखा बडनेरा रेल्वे, नंदनवन,चांदनी चौक,ता-नांदगाव.जि-अमरावती खाते क्र. ३५३६४४५०६६१ मध्ये विहीत कार्यपद्धतीनुसार जमा करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय संदर्भाधीन दि. २७/०८/१९६९, दि ८/१०/१९७० आणि दि. १७/०९/२०१९ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार मा. मुख्यमंत्री महोदय यांच्या मंजूरी नंतर निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०३०३१६३५२२२५०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

POONAM APPASAHEB NIKAT

Digitally signed by POONAM APPASAHEB NIKAT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=4244125d615d0ed721459edc809359f4ab75dd3e50a5a0a9a8c65e19e76ee1c5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D685FEFE26CBBD0A3DD72ECF2724309E44D5F2DB33F88465536810293EEA17B2, cn=POONAM APPASAHEB NIKAT
Date: 2022.03.03 16:37:01 +05'30'

**( पूनम निकत )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा.मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव, मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई
३) महालेखापाल, महाराष्ट्र (१/२), लेखा व अनुज्ञेयता, मुंबई / नागपूर
४) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
५) निवासी लेखाधिकारी, मुंबई,
६) उप सचिव (कोषा प्र-५/ अर्थ-३), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
७) धर्मादाय सह आयुक्त, गृह निर्माण भवन, २ रा माळा, माल टेकडी समोर, टोपे नगर, जि. अमरावती-४४४ ६०१
८) अध्यक्ष,शिवराय बहुउद्देशीय शिक्षण संस्था,फुलआमला,ता-नांदगाव खांडेश्वर,जि-अमरावती -४४१२२४
९) निवडनस्ती. (का-२५)